**प्रधान लेखाशीर्ष २०५९ - हुतात्मा स्मारकांचे परिरक्षण व निगा या योजनेअंतर्गत सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात वस्तुंची खरेदी GeM पोर्टलद्वारे जिल्हाधिकारी यांचे स्तरावर करण्यासाठी अनुदान वितरण.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण १९१८/प्र.क्र.९३/स्वासैक-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०९ ऑक्टोबर, २०१८

वाचा :- १) शासन निर्णय साप्रवि क्र. बियुडी१३१५/प्र.क्र.२९४/स्वासैक-१,दि. ५/०१/२०१७ व दि.१४/०३/२०१७
२) शासन निर्णय क्र. बियुडी १४१७/प्र.क्र. १७२/स्वासैक-१, दि. १४/०२/२०१८
३) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/ अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८
४) श्वेत पुस्तिका (White Book) २०१८-१९ भाग दोन-खर्चाचे तपशिलवार अर्थसंकल्पीय अंदाज

**प्रस्तावना :-**

भारतीय स्वातंत्र्य लढा, हैद्राबाद मुक्ती संग्राम तसेच गोवा मुक्ती आंदोलन यामध्ये भाग घेऊन ज्यांनी देशासाठी प्राणार्पण केले, अशा व्यक्तींच्या स्मरणार्थ शासनाने राज्यात २०६ हुतात्मा स्मारके उभारलेली आहेत. सदर स्मारके बांधून आता ३४-३५ वर्षाचा कालावधी उलटून गेला असल्याने त्यांची दुरूस्ती/नूतनीकरण करणे आवश्यक असल्याने मा.मंत्री, वित्त,नियोजन व वने यांनी सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पीय भाषणात हुतात्मा स्मारकांची दुरूस्ती व नूतनीकरण करण्याकरिता रू. २५ कोटी नियतव्यय उपलब्ध करून देण्याची घोषणा केली होती. सदर रु. २५ कोटी इतका निधी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात विधानमंडळाच्या जुलै, २०१६ च्या अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे प्राप्त झाला. त्यानुसार हुतात्मा स्मारकाच्या दुरूस्ती/ नुतनीकरणासाठी निधी संदर्भाधीन क्र. ०१ व क्र. ०२ येथील शासननिर्णयान्वये सर्व संबंधित जिल्हाधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आला. अद्यापही सदर हुतात्मा स्मारकांचे कामे शिल्लक असल्याने सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता रु. ६,००,००,०००/-(रु. सहा कोटी) इतका निधी प्राप्त झाला असून त्यानुसार राज्यातील २०६ हुतात्मा स्मारकांसाठी आवश्यक असलेल्या प्रोजेक्टर पडद्यासह, ५० खुर्च्या व ग्रंथालयासाठी कपाट या वस्तुंची खरेदी GeM पोर्टलद्वारे जिल्हाधिकारी स्तरावर खरेदी करण्यासाठी आवश्यक अनुदान संबंधित जिल्हाधिका-यांच्या स्वाधीन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमुद बाब विचारात घेवून राज्यातील हुतात्मा स्मारकाच्या दुरूस्ती/ नुतनीकरणासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध रू. ६,००,००,०००/-

(रु.सहा कोटी फक्त) निधी राज्यातील २०६ हुतात्मा स्मारकांसाठी मंजुर करण्यात आला आहे. संदर्भ क्र. ३ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रानुसार ७०% च्या मर्यादेत रु. ४,२०,००,०००/- (रु. चार कोटी वीस लाख फक्त) खर्चास उपलब्ध झाले आहेत.

२. राज्यातील २०६ हुतात्मा स्मारकांसाठी आवश्यक असलेल्या प्रोजेक्टर पडद्यासह , ५० खुर्च्या व ग्रंथालयासाठी कपाट या वस्तुंची खरेदी GeM पोर्टलद्वारे जिल्हाधिकारी यांचे स्तरावर करण्यासाठी प्रती स्मारक रु. १,००,०००/- (रु. एक लाख फक्त) याप्रमाणे राज्यातील २०६ हुतात्मा स्मारकांसाठी एकूण रु. २,०६,००,०००/- (रु. दोन कोटी सहा लाख फक्त) एवढा निधी संबंधित जिल्हाधिकारी यांना वितरित करण्यात येत आहे. स्मारकांकरीता निधी वापरूनसुध्दा काही निधी शिल्लक राहत असल्यास तो चालू आर्थिक वर्ष संपण्यापुर्वी शासनास समर्पित करण्यात यावा.

३. जिल्हाधिकाऱ्यांना वितरीत केलेल्या निधीतून खर्च केलेल्या अनुदानाच्या रकमांचा ताळमेळ महालेखापाल-१, मुंबई/महालेखापाल-२, नागपूर यांचेकडे विहित कालावधीत करुन खर्चमेळाचा अहवाल शासनास सादर करावा. याप्रकरणी शासन परिपत्रक क्र. खर्चमेळ २०११/ प्र.क्र.१३९/ २०११/स्वासैक-१, दिनांक १६/८/२०११ नुसार कार्यवाही करावी.

४. याप्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षातील खर्च (अ) क्रमांक ए-४ २०५९- सार्वजनिक बांधकामे, (८०) सर्वसाधारण,०५३- परिरक्षण व दुरुस्ती (००) (०१) हुतात्मा स्मारकांचे परिरक्षण व निगा यासाठी सहायक अनुदान (२०५९ ००१५) या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तिय वर्षाच्या मंजूर अंदाजपत्रकीय तरतुदीतून भागविण्यात यावा आणि त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा.

५. संबंधीत जिल्हाधिका-यांनी वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तीन महिन्यात सादर करावे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८१००९१६५४३०७२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suresh Mahadeo Khade

Digitally signed by Suresh Mahadeo Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=14c299447f4a6e6c33ab3f7a85fbf010628981e82f8311a81d1cf974681485c2, serialNumber=f0b4c833a6fc7c6fb7cb0a96a3e2bb79d42d283b8f0f7bfc1ae95298d60bacf1, cn=Suresh Mahadeo Khade
Date: 2018.10.09 16:57:17 +05'30'

**( सु. म. खाडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई,

५) प्रधान सचिव व वि. चौ. अ. -१ यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र २, नागपूर,
८) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १, मुंबई,
९) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र २, नागपूर,
१०) सर्व विभागीय आयुक्त,
११) सर्व जिल्हाधिकारी,
१२) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,
१३) स.स. (स्वासैकक्ष), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई ३२,
१४) सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,
१५) सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,
१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१९) सामान्य प्रशासन विभाग, का.२५, मंत्रालय, मुंबई,
२०) क.अ. वित्त विभाग, (अर्थ संकल्प १३ / व्यय-४) मंत्रालय, मुंबई,
२१) निवड नस्ती (स्वासैक १).

हुतात्मा स्मारकांचे परिरक्षण व निगा,
साप्रवि शासन निर्णय क्र संकीर्ण १९१८/प्र.क्र. ९३/स्वासैक-१, दि. ०९ ऑक्टोबर, २०१८ चे सोबतचे

**विवरणपत्र**

| अ.क्र. | जिल्हा | हुतात्मा स्मारकांची संख्या | एकूण वितरीत अनुदान (रु.) |
|---|---|---|---|
| *१* | *२* | *३* | *४* |
| १ | पालघर | ८ | ८,००,००० |
| २ | रायगड | १६ | १६,००,००० |
| ३ | सिंधुदुर्ग | ४ | ४,००,००० |
| ४ | नाशिक | ६ | ६,००,००० |
| ५ | जळगाव | २ | २,००,००० |
| ६ | नंदुरबार | १ | १,००,००० |
| ७ | अहमदनगर | ५ | ५,००,००० |
| ८ | पुणे | ७ | ७,००,००० |
| ९ | सातारा | १४ | १४,००,००० |
| १० | सांगली | १५ | १५,००,००० |
| ११ | सोलापूर | ५ | ५,००,००० |
| १२ | कोल्हापूर | ८ | ८,००,००० |
| १३ | औरंगाबाद | ७ | ७,००,००० |
| १४ | जालना | ५ | ५,००,००० |
| १५ | बीड | ७ | ७,००,००० |
| १६ | नांदेड | १६ | १६,००,००० |
| १७ | हिंगोली | १० | १०,००,००० |
| १८ | परभणी | ५ | ५,००,००० |
| १९ | लातूर | ८ | ८,००,००० |
| २० | उस्मानाबाद | ११ | ११,००,००० |
| २१ | अमरावती | १० | १०,००,००० |
| २२ | बुलढाणा | ३ | ३,००,००० |
| २३ | यवतमाळ | २ | २,००,००० |
| २४ | अकोला | १ | १,००,००० |
| २५ | नागपूर | ११ | ११,००,००० |
| २६ | वर्धा | ८ | ८,००,००० |
| २७ | भंडारा | ३ | ३,००,००० |
| २८ | गोंदिया | ३ | ३,००,००० |
| २९ | गडचिरोली | १ | १,००,००० |
| ३० | चंद्रपूर | ४ | ४,००,००० |
|  | **एकूण** | **२०६** | **२,०६,००,०००** |